**केंद्र शासन, राज्य शासन व खाजगी सहभागातून भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था {Indian Institute of Information Technology (IIIT)} या संस्थेची नागपूर येथे स्थापना करणेबाबत .....**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः IIIT -२०१३/(२३/१३)/तांशि-२.**

मंत्रालय विस्तार भवन,

मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २२ जून, २०१५

## <u>प्रस्तावना</u>

भारतीय माहिती व तंत्रज्ञान उद्योगाला चालना देण्याकरिता मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी देशात Not for profit Public Private Partnership (N-PPP) द्वारे भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था [Indian Institute of Information Technology (IIIT)] स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे. यामध्ये मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार, संबंधीत राज्य शासन व Industry Partners हे भागीदार असणार आहेत. त्यानुसार राज्य शासनाने नागपूर येथे भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था Indian Institute of Information Technology (IIIT) या संस्थेची स्थापना करण्याबाबत दिनांक १८/१/२०१३ च्या पत्रान्वये मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांना अवगत केले होते. मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी नागपूर येथे IIIT या संस्थेची स्थापना करण्यास दिनांक १/५/२०१५ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे.

२. Indian Institute of Information Technology (IIIT) ची नागपूर येथे स्थापना करण्यासाठी राज्य शासनाने सूचविलेल्या मौजे वारंगा ता. नागपुर (ग्रामीण) जि. नागपुर येथील सर्व्हे नं. १४० आराजी ७६.२९ हे. आर. पैकी ३६.२९ हे. आर. व सर्व्हे क्रमांक १४१ आराजी ७.६७ हे. आर. मधील ३.६७ हे. आर. अशी एकूण ३९.९६ हे. आर. जागेची केंद्र शासनाच्या मनुष्य बळ विकास मंत्रालयाने निवड केली आहे. केंद्र शासनाने सदर जागेस दिनांक १/५/२०१५ च्या पत्रान्वये सहमती दर्शविली आहे

३. नागपूर येथे Indian Institute of Information Technology (IIIT) या संस्थेची स्थापना करण्यासाठी पारदर्शकता व गुणवत्तेनुसार भागीदारांची निवड करण्यासाठी तज्ञ समिती गठित करण्यात आली होती. आमंत्रित उद्योजकांमधून तज्ञ समितीने निम्न नमूद उद्योजकांना नागपूर येथे IIIT स्थापनेसाठी उद्योजक भागीदार म्हणून प्रस्ताविले होते. त्यानुसार केंद्र शासनाने दिनांक ११/१०/२०१३ च्या पत्रान्वये सहमती दिली आहे.

१. ADCC, Nagpur

२. Tata Consultancy Services Limited, Mumbai.

४. केंद्र शासनाच्या या योजनेअंतर्गत प्रस्तावित संस्था स्थापन करण्याची वित्तीय जबाबदारी केंद्र शासन, राज्य शासन आणि सहभागी खाजगी भागीदार यामध्ये विभागली जाणार आहे.

५. Indian Institute of Information Technology (IIIT) करीता होणा-या खर्चासाठी मागणी क्रमांक डब्ल्यु-३ २२०३, तंत्रशिक्षण, (००)(०४) भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्थेची स्थापना करणे, ०१ वेतन, ५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री या लेखाशिर्षाखाली तरतुद करण्यात आलेली आहे.

प्रस्तुत प्रकरणी उक्त नमूद केल्यानुसार राज्यात Indian Institute of Information Technology (IIIT) या शैक्षणिक उपक्रमाची नागपूर येथे स्थापना करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधिन होती. या प्रकरणी दिनांक २०/५/२०१५ रोजीच्या मंत्रीमंडळाच्या बैठकित खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय

१. राज्यात Indian Institute of Information Technology (IIIT) या संस्थेची केंद्र शासनाच्या योजनेंतर्गत Not for profit - Public Private Partnership (N-PPP) तत्त्वावर मौजे वारंगा ता. नागपुर (ग्रामीण) जि. नागपुर येथील सर्व्हे नं. १४० आराजी ७६.२९ हे. आर. पैकी ३६.२९ हे. आर. व सर्व्हे क्रमांक १४१ आराजी ७.६७ हे. आर. मधील ३.६७ हे. आर. अशी एकूण ३९.९६ हे. आर. क्षेत्रात स्थापन करण्यास राज्य शासनाची मान्यता देण्यात आली आहे.

२. नागपूर येथे IIIT स्थापनेसाठी आमंत्रित उद्योजकांमधून या करीता नियुक्त केलेल्या तज्ञ समितीने प्रस्ताविलेल्या खालील उद्योजकांना "उद्योजक भागीदार" म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

१. ADCC, Nagpur.

२. Tata Consultancy Services Limited, Mumbai.

३. केंद्र शासनाच्या या योजनेअंतर्गत प्रस्तावित संस्था स्थापन करण्याची वित्तीय जबाबदारी केंद्र शासन, राज्य शासन आणि सहभागी खाजगी भागीदार यामध्ये विभागली जाणार असून त्यास शासनाची खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

- संस्था स्थापनेसाठी एकूण १०० एकर जागा राज्य शासनाव्दारा उपलब्ध करुन देणे.
- केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे केंद्र शासन व खाजगी उद्योजक भागीदारांसोबत राज्य शासनाचा MoU व MoA करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे नियामक मंडळ (BoG) व इतर मंडळ स्थापन करण्यात येतील.
- भारतीय माहिती तंत्रज्ञान संस्था हि Not for profit Public Private Partnership (N-PPP) या तत्त्वावरील असल्याने खाजगी उद्योजक भागीदारांना MoA व MoU प्रमाणे जबाबदारी पुर्ण करावी लागेल. मात्र संस्थेला कोणताही नफा घेता येणार नाही.
- संस्था स्थापनेसाठी एकूण भांडवली खर्च (अनावर्ती खर्च) रु. १२८ कोटी एवढा होणार आहे.
- सदर खर्चापैकी केंद्र शासनाचा ५० टक्के हिस्सा, राज्य शासनाचा ३५ टक्के हिस्सा व खाजगी भागीदारांचा १५ टक्के हिस्सा अशा प्रमाणात विभागला आहे.
- त्यानुसार केंद्रशासनामार्फत रु. ६४ कोटी, राज्य शासनामार्फत रु. ४५ कोटी व प्रकल्पात सहभागी होणाऱ्या दोन खाजगी उद्योजक भागीदारांमार्फत प्रत्येकी रु. १० कोटी असा एकूण रु. २० कोटी इतका निधी उपलब्ध करावयाचा आहे.
- संस्था स्थापनेनंतर पहिल्या ४ वर्षासाठी कमाल रु. १० कोटीपर्यंत आवर्ती खर्चाचे अनुदान केंद्रशासनाव्दारा उपलब्ध होणार आहे.
- Faculty Development साठी केंद्रशासन प्रत्येक IIIT करीता रु. २.५ कोटीचे अनुदान उपलब्ध करुन देणार आहे.

- उपरोक्त नमूद केल्यानुसार भांडवली खर्च (अनावर्ती खर्च ) रु.१२८ कोटी व आवर्ती खर्च रु.१२.५० कोटी (आवर्ती खर्चाकरीता केंद्र शासनाचे रु.१० कोटी व Faculty Development करीता केंद्र शासनाचे प्रत्येक IIIT करीता रु. २.५ कोटीचे अनुदान) असा एकुण रु. १४०.५० कोटीचा खर्च प्रस्तुत प्रकल्पाकरीता अपेक्षित आहे.
- सदरची संस्था स्वायत्त असून ती स्वयंअर्थसहाय्यीत होऊन प्रकल्पाकरीता होणारा पुढील आवर्ती खर्च भागविणे अपेक्षित आहे.

५. प्रस्तुत प्रकरणी राज्य शासनाच्या हिश्याची रु. ४५ कोटी इतकी रक्कम प्रकल्पाच्या टप्यानुसार उपलब्ध करुन देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१२१५०८५७९३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY AMBADAS CHAHANDE

Digitally signed by SANJAY AMBADAS CHAHANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=YASHADA, postalCode=411007, st=Maharashtra, cn=SANJAY AMBADAS CHAHANDE
Date: 2015.06.24 12:38:05 +05'30'

**(डॉ. संजय चहांदे)**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) / मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा. सर्व मंत्री / सर्व मा. राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव , मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव , मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक. मंत्रालय, मुंबई -४०००३२
८. सर्व सहसचिव / उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९. सर्व अकृषी विद्यापिठांचे कुलगुरु / कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंज्ञशास्त्र विद्यापिठ, लोणेरे, ता. माणगांव, जि. रायगड / कुलगुरु, रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई.
१०. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
११. सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये
१२. अवर सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई -४०००३२
१३. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०००३२
१४. संबंधित उद्योजक भागीदार
१५. निवडनस्ती